मा. उच्च न्यायालय,मुंबई यांनी रिट पिटीशन क्र.१८४४/१९९८ मध्ये दि.१८/८/२००९ व मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी सिव्हील अपील क्र.८८२१/२०११ मध्ये दिनांक ५/४/२०२४ दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अर्जदारास मुद्रांक शुल्काच्या परतावा रकमेवरील व्याज रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. याचिका- २०२४/प्र.क्र.११४/म-१(धोरण)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०२४.

**वाचा :** १) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.का.१२/प्र.क्र.१४१४/३३८३, दि.६.११.१९९७ तसेच आदेश क्र. का.१२/मु.प /प्र.क्र.८८/२०२४/५१२,दि.६.५.२०२४

२) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.का.१२/मु.प.प्र.क्र.८८-२४/५१३/२०२४/ दिनांक ०६.०५.२०२४

३) मा. उच्च न्यायालय,मुंबई यांचेकडील रिट पिटीशन क्र. १८४४/१९९८, दि.१८/८/२००९ रोजीचे आदेश

४) सर्वोच्च न्यायालय, सिव्हील अपील क्र.८८२१/२०११, दिनांक ०५/४/२०२४ मधील न्यायनिर्णय.

५) शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना** :

नॅशनल ऑरगॅनिक केमिकल इंडस्ट्रीज लिमिटेड, मफतलाल सेंटर, नरीमन पॉईट,मुंबई यांनी दि.९/१/१९९५रोजी Special Adhesive Stamp व्दारे खरेदी केलेल्या रु.२५,००,०००/- इतक्या रकमेच्या मुद्रांक शुल्क परताव्यासाठी महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या कलम ४८ उपकलम ३ खालील तरतुदीनुसार ६ महिन्यांच्या आत अर्ज दाखल केला आहे. मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.६.११.१९९७ रोजीच्या आदेशान्वये शेअर भांडवल वाढविण्याबाबत प्रत्येक वेळी केलेला दस्त हा स्वतंत्र दस्त समजण्यात येईल व त्यावर स्वतंत्र मुद्रांक शुल्क देय राहील अशी निरीक्षणे नोंदवून अर्जदारांची मुद्रांक शुल्क परताव्याची विनंती अमान्य केली होती.

तथापि, अर्जदाराने मा उच्च न्यायालयाने व.दाखल केलेल्या याचिकांप्रकरणी मा न्यायालयात . मा सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशास अनुसरून .अर्जदारास मुद्रांक शुल्क परतावा रकमेवरील %६ दराने येणारी व्याजाची रक्कम रु.४३,९२,५००) -/अक्षरी त्रेचाळीस लक्ष ब्यान्नव हजार पाचशे फक्त) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

नॅशनल ऑरगॅनिक केमिकल इंडस्ट्रीज लिमिटेड विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.१८४४/१९९८ मध्ये दि.१८/८/२००९ रोजी व मा .सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी सिव्हील अपील क्र.८८२१/२०११ मध्ये दिनांक ५/४/२०२४ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाच्या अनुषंगाने मुद्रांक शुल्क परतावा रक्कम रु.२५,००,००० या रकमेवरील ६ % दराने येणारी व्याजाची रक्कम रु.४३,९२,५००/ -(अक्षरी त्रेचाळीस लक्ष ब्यान्नव हजार पाचशे मात्र) अर्जदारास अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील बाबीकरीता होणारा खर्च विभागाच्या मागणी क्र. सी-२, मुख्य लेखाशीर्ष- २०३०, नोंदणी- ०३, संचालन व प्रशासन००१-, ((००)(००(०१) नोंदणी महानिरीक्षक व जिल्हा निबंधक (अनिवार्य) २०३००१०९, कार्यालयीन खर्च- १३ या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्चाच्या ताळमेळाकरिता नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३ . हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ / विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-२, नियम क्रमांक -७ नुसार, प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार तसेच वित्त विभाग/व्यय-१०, अनौपचारिक संदर्भ क्र. ३०९७/व्यय१०-, दिनांक १६/५/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.,maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१०१७२९३२८६१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2024.06.10 17:42:46 +05'30'

**( सुनिल जाधव )**
**कार्यासन अधिकारी,महसूल व वन विभाग**

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
२) महालेखापाल १/२ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपूर.
३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) अपर मुद्रांक नियंत्रक,प्रधान मुद्रांक कार्यालय यांना उचित कार्यवाहीस्तव
५) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, वांद्रे (पूर्व),मुंबई-४०००५१
६) नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक,मुंबई यांना अवगत करण्यात येते की,सदर व्याजाची रक्कम आहरण करुन संबंधितांस वितरीत करण्याची कार्यवाही करावी.
७) कक्ष अधिकारी(व्यय-१०),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
८) निवडनस्ती म-१(धोरण)/महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२